**भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेचा वाहन आढावा व वाहन अनुज्ञेय करणेबाबत**

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः वाहन-२८२२/प्र.क्र.२५८/पापु-१५

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत, क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य
टिळक मार्ग, मुंबई- ४०० ००१
तारीख: ०३ ऑगस्ट, २०२३

**वाचा:**

१. **शासन निर्णय क्रमांकः वाहन १०००/प्र.क्र.६५/२००१/विनियम, दि.१०.०९.२००१**
२. **आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांचे पत्र क्र. आवेधन/कक्ष-२/ वाहनांचा आढावा/ पं.क्र. ३४/५१७/२०२२, दि.२२.०७.२०२२**

**प्रस्तावना:**

वाचा येथील क्र.१ च्या शासन निर्णयान्वये शासकीय व इतर कार्यालयांमध्ये वाहनांच्या वापरासंबंधी धोरण निश्चित केले आहे. सदर शासन निर्णयान्वये वाहन अभिहस्तांकित असलेल्या अधिकाऱ्यांच्या जबाबदाऱ्या विचारात घेऊन वाहनांचा व वाहन प्रवर्गाचा आढावा प्रशासकीय विभागाने घेण्याचे निर्देश दिले आहेत. यास अनुसरून पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अधिनस्त असलेल्या भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेचा आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांनी संचालनालयासह अधिनस्त असलेल्या सर्व कार्यालयाकडे असलेल्या वाहनांचा आढावा घेऊन वाहनांचा आढावा मंजुर करणेबाबतचा प्रस्ताव वाचा क.२ च्या पत्रान्वये शासनास सादर केला होता. वाचा क्र.१ नुसार विहीत कार्यपद्धतीस अनुसरून सदर प्रस्ताव राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला असता समितीने दिलेल्या मान्यतेस अनुसरून भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेकरिता वाहन अनुज्ञेय करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:

भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेच्या आस्थापनेवरील पदांची कर्तव्ये व जबाबदा-या यांचा विचार करून ज्या ज्या पदांकरिता वाहन सुविधा आवश्यक आहे त्या पदांना वाहन अनुज्ञेय करण्याकरिता राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेने वाहन आढाव्यास पुढीलप्रमाणे मंजूरी देण्यात येत आहे:

०२. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अधिनस्त भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेच्या संचालनालय (मुख्यालय), प्रादेशिक विभाग व जिल्हास्तरीय कार्यालयांकरिता खालील तपशीलानुसार एकूण ११२ वाहने (०५ कार व १०७ जीप) अनुज्ञेय करण्यात येत आहेत.

| अ. क्र. | कार्यालय | पदनाम | अनुज्ञेय वाहन प्रकार व संख्या | | एकूण वाहने | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | कार | जीप | कार | जीप |
| १. | संचालनालय (मुख्यालय) | आयुक्त | ०१ | - | ०५ | ०३ |
| | | अति. संचालक | ०१ | - | | |
| | | सहसंचालक | ०२ | - | | |
| | | सहसंचालक (अभियांत्रिकी) | ०१ | - | | |
| | | उपसंचालक (संविक)/ उपसंचालक | - | ०१ | | |
| | | मुख्य खोदन अभियंता/ मुख्य भूभौतिक तज्ञ | - | ०१ | | |
| | | वरिष्ठ रसायनी/वरिष्ठ खोदन अभियंता/ वरिष्ठ भूवैज्ञानिक/ उप अभियंता (यां)/ प्रशासन अधिकारी/ सहा. संचालक (म.वि.व ले.से.) | | ०१ | | |
| २. | प्रादेशिक उपसंचालक | उपसंचालक (कोकण, नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती व नागपूर) | - | ०६ | - | १८ |
| | | वरिष्ठ भूवैज्ञानिक/ वरिष्ठ खोदन अभियंता | - | ०६ | | |
| | | वरिष्ठ भूभौतिक तज्ञ/ उप अभियंता (यां)/ सहायक रसायनी | - | **०६** | | |
| ३. | जिल्हा स्तरीय कार्यालये | वरिष्ठ भूवैज्ञानिक /(सहाय्यक /कनिष्ठ भूवैज्ञानिक)- पालघर, ठाणे, रत्नागिरी, सिंधुदूर्ग, धुळे, नंदूरबार, औरंगाबाद, जालना, परभणी, हिंगोली, उस्मानाबाद, अकोला, वाशिम, वर्धा, भंडारा व गोंदिया या १६ जिल्ह्यांकरिता प्रत्येकी १ याप्रमाणे | - | १६ | - | ५२ |
| | | वरिष्ठ भूवैज्ञानिक /(सहाय्यक /कनिष्ठ भूवैज्ञानिक)- रायगड, नाशिक, जळगाव, अहमदनगर, पुणे, सातारा, सांगली, सोलापूर, कोल्हापूर, लातुर, नांदेड, बीड, अमरावती, यवतमाळ, बुलढाणा, नागपूर, चंद्रपूर व गडचिरोली या १८ जिल्ह्यांकरिता प्रत्येकी २ याप्रमाणे | - | ३६ | | |
| ४. | यांत्रिकी उपविभाग, जिल्हा परिषद | उप अभियंता (यांत्रिकी)- मुंबई शहर व मुंबई उपनगर जिल्हे वगळता उर्वरित ३४ जिल्ह्यांकरिता प्रत्येकी ०१ जीप याप्रमाणे | - | ३४ | - | ३४ |
| **एकूण** | | | | | ०५ | १०७ |

**०३.** वाहन खरेदी अथवा वाहन भाड्याने घेण्याबाबत विहित वित्तीय प्राधिकारानुसार व वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सुचनांनुसार सक्षम प्राधिका-यांच्या पूर्वमान्यतेने यथोचित कार्यवाही करावी.

**०४.** भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेच्या दि. २४.०४.२०२३च्या आकृतीबंधास अनुसरून उपरोक्त मान्यता देण्यात येत आहे.

**०५.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७१/२०२३/विनियम, दि.२३.०२.२०२३ अन्वये राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या दिलेल्या मान्यतेने तसेच निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८०३१६०६३८५३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA MAHADEV GENGAJE

Digitally signed by RAJENDRA MAHADEV GENGAJE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=9e6d5121ea1547c5b6abac50546c582bc9cb02d8c4ee0e57eb3442ad725208b5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D90328C2FC4E73B881BCFEA3BC5824FA462A2EC1E4EAD4BFE3B4979112BDB493, cn=RAJENDRA MAHADEV GENGAJE
Date: 2023.08.03 18:05:00 +05'30'

**(रा.म. गेंगजे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव
४. मा. मंत्री (पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग) यांचे खाजगी सचिव
५. अपर मुख्य सचिव, (व्यय), वित्त विभाग तथा अध्यक्ष, राज्यस्तरीय वाहन आढावा समिती
६. अपर मुख्य सचिव (प्र.सु. व र.व.का.) सामान्य प्रशासन विभाग तथा सचिव, राज्यस्तरीय वाहन आढावा समिती
७. परिवहन आयुक्त, मुंबई सदस्य सचिव, राज्यस्तरीय वाहन आढावा समिती
८. प्रधान सचिव, (पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग) यांचे स्वीय सहाय्यक
९. आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
१०.सर्व प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा
११.सर्व जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा
१२.महालेखाकार, लेखापरिक्षा/अनुज्ञेयता १ /२, नागपूर/ मुंबई
१३.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी